**<u>शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना</u>**
**खंडीत कालावधीचे दावे अदा करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय, क्रमांक शेअवि २००८/प्र.क्र.४२०/११अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ८ फेब्रुवारी, २०११

**वाचा:-** १) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस-१२०४/प्र.क्र.१६६/११अे,दि.१९ऑगस्ट,२००४
२) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस-१२०४/प्र.क्र.१६६/११अे,दि.५जानेवारी,२००५
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.एनएआयएस-१२०४/प्र.क्र.१६६/११अे, दि.३१मार्च, २००५
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.पीएआयएस १२०५/प्र.क्र.३१०/११अे, दि.७जुलै, २००६
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.शेअवि २००८/प्र.क्र.१३१/११अे, दि. ३ मे, २००८
६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.शेअवि २००८/प्र.क्र.४२०/११अे, दि.२२ फेब्रुवारी, २०१०
७) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शेअवि २००८/प्र.क्र. ३४/सां९/ ६१/२०१०, दि. १५ फेब्रुवारी,२०१०.
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शेअवि २००८/प्र.क्र. ३४/सां९/ ३१३/२०१०, दि. २३ ऑगस्ट ,२०१०.
९) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२०१०/प्र.क्र.१७२/११-अे, दि. ११ नोव्हेंबर, २०१०
१०) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र.पुनर्वि-२०१०/भाग-२/(प्र.क्र.१८७/१०)/२अे, दि.१८ जानेवारी, २०११

**प्रस्तावना :-**

शेतकऱ्यांना शेती व्यवसाय करताना अथवा अन्यवेळी होणाऱ्या अपघातापासून कोणत्याही प्रकारचे विमा संरक्षण उपलब्ध नव्हते व त्यासाठी कोणतीही योजना नव्हती. यास्तव, शासनाने शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना सुरु केली. प्रथमतः सदर योजना दिनांक १० जानेवारी, २००५ ते ९ एप्रिल,२००६ या १५ महिन्यांच्या कालावधीसाठी आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इन्शुरन्स कंपनीमार्फत राबविण्यात आली. त्यानंतर या योजनेचे अथवा पॉलिसीचे पुढील वर्षासाठी नुतनीकरण करण्याच्या प्रक्रियेमध्ये दि. १० एप्रिल, २००६ ते १४ जुलै, २००६ असा एकूण ९६ दिवसांचा खंड पडला होता. या खंडीत कालावधीतील प्राप्त विमा दावे मंजूर करून अदा करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना उपरोक्त क्र.५ येथील शासन निर्णयान्वये प्राधिकृत करण्यात आले आहे. या खंडीत कालावधीतील प्राप्त विमा दावे तपासून त्यांच्या पात्र/अपात्रतेबाबतची छाननी कबाल इन्शुरन्स ब्रोकिंग सर्व्हिसेस प्रा.लि., मुंबई या शासन नियुक्त विमा सल्लागार कंपनीमार्फत करण्यात आली आहे.

खंडीत कालावधीतील प्राप्त विमा दाव्यांपैकी प्रथम टप्प्यात २८१ विमा दाव्यांकरिता रु.२,७७,५०,०००/- इतकी रक्कम उपरोक्त क्र.६ येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे. आयुक्त (कृषि) यांच्या अध्यक्षतेखालील समितीने खंडीत कालावधीतील उर्वरित विमा दाव्यांपैकी अनुक्रमे ८१ व

९७ असे एकूण अंतिम १७८ विमा दावे पात्र ठरविले असून त्याची यादी उपरोक्त क्र.७ व ८ येथील पत्रांसोबत शासनास सादर केली आहे. त्यापैकी मा.जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचांनी दिलेल्या आदेशानुसार २ प्रस्तावांसाठी उपरोक्त क्र.९ येथील शासन निर्णयान्वये रु.२.०० लाख इतकी रक्कम मंजूर करण्यात आली आहे. आता उर्वरित १७६ विमा दाव्यांकरिता एकूण रु.१६८.५० लाख इतकी रक्कम उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेंतर्गत शेतकऱ्याचा मृत्यू झाल्यास रु.१,००,०००/- व अपंगत्व आल्यास प्रकरणपरत्वे रु.५०,०००/- किंवा रु.१,००,०००/- या प्रमाणे अर्थसहाय्य मंजूर करण्यात येते.

२. योजनेच्या दिनांक १० एप्रिल,२००६ ते १४ जुलै,२००६ या खंडीत कालावधीतील प्राप्त दाव्यांपैकी पात्र ठरलेल्या अंतिम १७६ दाव्यांसाठी खालील लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ करिता मंजूर तरतुदीपैकी शिल्लक रक्कम रु.८०.०० लाख व उपरोक्त क्र.१० येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेली रक्कम रु.८८.५० लाख अशी एकूण रु.१,६८,५०,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी अडुसष्ठ लाख पन्नास हजार फक्त) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

"मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन, ११०-पीक विमा, (००) (०६) शेतकऱ्यांसाठी वैयक्तिक अपघात विमा योजना (२४०१ ४४२७), राज्य योजना, ३३-अर्थसहाय्य"

३. सदर प्रयोजनार्थ सहायक संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५/११/व्यय-१, दिनांक २७/१/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०२०९१५२०१९००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( र. ब. पुरोहित )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
४) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव

५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
७) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) सहायक संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे-१
१०) अध्यक्ष, कबाल इन्शुरन्स ब्रोकींग सर्व्हिसेस प्रा. लि., ११८-बी, मित्तल टॉवर, ११ वा मजला, २१०, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१
११) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर
१२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१५) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
१७) सर्व विभागीय कृषि सह संचालक
१८) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१९) सर्व सहसचिव /उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२०) निवड नस्ती, का. ११-अे